**महाराष्ट्र वन विकास महामंडळाला महाराष्ट्र वानिकी प्रकल्पासाठी दिलेले कर्ज व त्यावरील व्याज भागभांडवलात रुपांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीसी-२०१७/ प्र.क्र. ३८ /फ- ५**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- २४ मार्च, २०१७

<u>वाचा :</u>
१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एफडीसी-१०९६/प्र.क्र.२९/ फ-५ दिनांक १० सप्टेंबर, १९९७
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एफडसी २०११/प्र.क्र.१४/फ-५ दिनांक १९ डिसेंबर, २०१२
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ,मर्या. नागपूर यांचे पत्र क्र एफए/सीएसएल/३०९ दि.१८/०२/२०१७
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एफडीसी-२०१७/प्र.क्र.३८/फ-५ दि.२० मार्च २०१७
५) वित्त विभाग परिपत्रक क्रमांक पुरक-२०१७/प्र.क्र.६५/अर्थसं-३ दि.२३ मार्च, २०१७

<u>प्रस्तावना :</u>

महाराष्ट्र राज्यातील वने व वानिकी कार्यविधीचे शास्त्रोक्त पध्दतीने व्यवस्थापन व विकास करण्याच्या मुख्य उद्दिष्टाने महाराष्ट्र वनविकास महामंडळ मर्यादित या महाराष्ट्र शासनाचे संपूर्ण स्वामित्व असलेल्या सार्वजनिक उपक्रमाची कंपनी अधिनियम १९५६ अंतर्गत फेब्रुवारी, १९७४ मध्ये निर्मिती करण्यात आली.

शासनाकडून वेळोवेळी प्राप्त निर्देशानुसार जागतिक बँक मदतीअंतर्गत महाराष्ट्र वानिकी प्रकल्पाची कामे महामंडळाकडे सोपविण्यात आली होती. जागतिक बँक अर्थसहाय्य, प्रकल्पाअंतर्गत केंद्र शासनाने राज्य शासनास महाराष्ट्र वानिकी प्रकल्पांतर्गत सन १९९२ ते २००० पर्यंत अर्थ सहाय्य दिले होते. राज्य शासनाने या अर्थ सहाय्यातुन महाराष्ट्र वन विकास महामंडळास योजनांतर्गत व योजनेत्तर लेखा शिर्षाखाली एकूण रुपये १५८.७० कोटी कर्ज दिले होते. सदरहू रकमेपैकी रुपये १०४.२८ कोटी इतक्या कर्जाची महाराष्ट्र वनविकास महामंडळाने शासनास परतफेड केली आहे. शिल्लक कर्ज रु. ५४.४२ कोटी व त्यावरील व्याज / दंडाह्र्य व्याज रुपये २४०.१२ कोटी असे एकूण रुपये २९४.५४११ कोटी चे भागभांडवलात रुपांतर करण्यास शासन निर्णय दिनांक १९ डिसेंबर, २०१२ अन्वये शासनाने मान्यता दिलेली आहे.

शासन निर्णय संदर्भ क्रमांक २ दिनांक १९ डिसेंबर, २०१२ नुसार रुपये २९४.५४११ कोटी चे भागभांडवलात रुपांतर करण्याच्या अनुषंगाने सदरहू रकमेचे पुस्तकी समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

१. शासन निर्णय संदर्भ क्र. ४, दि. २० मार्च २०१७ अन्वये व्यवस्थापन कार्यनियमावलीतील कलम ४४ व व कंपनी अधिनियम २०१३ चे कलम ६२(४) नुसार महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित नागपूर या सार्वजनिक उपक्रमाचे अधिकृत भागभांडवल मर्यादा रुपये ३३०.०० कोटी करण्यात आले आहे.

२. महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित नागपूर या सार्वजनिक उपक्रमामध्ये राज्य शासनाची भांडवली गुंतवणूक रुपये२९४ . ५४११कोटी) रुपये दोनशे चौऱ्यान्नव कोटी चौपन्न लक्ष अकरा हजार मात्र (इतकी रक्कम पुस्तकी समायोजनाद्वारे वितरीत करण्यास या द्वारे मंजूरी देण्यात येत आहे .

३. वरील बाबीचा खर्च " मागणी क्रमांक सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, (०१) महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादितचे भाग भांडवल (४४०६ ०१९८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून समायोजित करण्यात यावा.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

५. वरील मंजूर झालेल्या भागभांडवलाची संपूर्ण रक्कम महाराष्ट्र वनविकास महामंडळ मर्यादित नागपूर यांना रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र वन विकास महामंडळाकडून शासनास येणे असलेल्या रकमेपोटी वसूल करण्यात यावा. आणि खाली नमूद केलेल्या जमा लेखाशिर्षाखाली समायोजनाद्वारे जमा करण्यात यावा.

| अ.क्र. | तपशिल | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र वन विकास महामंडळास शासनाने दिलेल्या कर्जाच्या मुद्दलीपोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम | रु. ५४,४१,९२,२४९/- | ६४०६ वनीकरण व वन्यजीवन यासाठी कर्ज, १०४ (००) (०१) वनीकरण वनीकरण व वन्यजीव यांचेसाठी कर्ज (६४०६ ५०२ १) |
| | महाराष्ट्र वन विकास महामंडळास शासनाने दिलेल्या कर्जावरील व्याजापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम | रु.२४०,१२,१८,७५१/- | ००४९ व्याजाच्या रक्कमा १९० सरकारी उपक्रम यांचेकडून व्याज, (०१) सरकारी क्षेत्र व इतर उपक्रम यांचेकडून व्याज (०१) (१७) वने विकास महामंडळाला दिलेल्या कर्जावरील व्याज (००४९ ०८७ ६) |
| | **एकूण** | **रु. २९४,५४,११,०००/-** | |

६. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल नागपूर यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नयेत.

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात रुपये २९४,५४,११,०००/- (रुपये दोनशे चौऱ्यान्नव कोटी, चौपन्न लाख, अकरा हजार फक्त ) चे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

८. सदरहू आदेश नियोजन विभागाचे अ.शा. पत्र क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१६(भाग-१)/ का-१४११ दि. ४ मार्च, २०१७ व वित्त विभागाचे परिपत्रक क्र. पुरक-२०१७/प्र.क्र.६५/अर्थसंकल्प-३ दिनांक २३ मार्च, २०१७ नुसार प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२४१८३७५१८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.03.24 18:38:33 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३. निवासी लेखाअधिकारी, नागपूर
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (सार्वजनिक उपक्रम) / (व्यय-१०) मंत्रालय, मुंबई
७. मा. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग (का-१४७५)/(का-१४११), मंत्रालय, मुंबई
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास मंडळ मर्यादित नागपूर.
१०. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२. सह संचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला मंत्रालय मुंबई-३२.
१३. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
१४. मा .राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
१५. सचिव (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
१६. लेखा नियंत्रक व वित्तीय सल्लागार, एफ.डी.सी.एम .लि. नागपूर
१७. कंपनी सचिव, एफ.डी.सी.एम .लि. नागपूर
१८. निवड नस्ती (फ-५) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.